प्रधानमंत्री आवास योजनेंतर्गत सार्वजनिक-खाजगी भागीदारी (PPP) तत्वावरील प्रकल्पांसाठी केंद्र सरकारने निर्गमित केलेल्या प्रतिकृतीची (Model) राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## गृहनिर्माण विभाग

**शासन शुध्दीपत्रक क्रमांकः प्रआयो/२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२/शिकाना**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक: २६ नोव्हेंबर, २०१८.

वाचा -

१) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो/२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२/शिकाना, दि. ११/१/२०१७

२) शासन परिपत्रक, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो/२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२/शिकाना, दि. २४/१/२०१८.

३) शासन शुध्दीपत्रक, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो-२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२, दि. २४/१/२०१८.

४) शासन शुध्दीपत्रक, गृहनिर्माण विभाग क्र.प्रआयो-२०१७/प्र.क्र.१२/गृनिधो-२, दि. ११/६/२०१८.

शुध्दीपत्रक-

उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या शासन शुध्दीपत्रकातील मुद्दा क्र.२ ऐवजी पुढील प्रमाणे वाचण्यात यावे:-

अ) **राज्यातील ज्या भागामध्ये बाजार मूल्य दर (ASR) व गृहप्रकल्प किंमत यातील फरक ३०% पर्यंत असेल (ASR कमी), सदर ठिकाणच्या गृहप्रकल्पातील ५०% घरकुलांची विक्री दि.११ जून, २०१८ रोजीच्या धोरणानुसार बाजार मूल्य दर (ASR) किंमतीच्या १०% पर्यंत प्रोत्साहनात्मक अधिकची किंमत घेऊन विकण्यास विकासकास परवानगी राहील.**

ब) **राज्यातील ज्या भागामध्ये बाजार मूल्य दर (ASR) व गृहप्रकल्प किंमत यातील फरक ३०% पेक्षा जास्त असेल (ASR कमी), सदर ठिकाणच्या गृहप्रकल्पातील ५०% घरकुलांची विक्री दि.११ जून, २०१८ रोजीच्या धोरणानुसार बाजार मूल्य दर (ASR) किंमतीच्या २०% पर्यंत प्रोत्साहनात्मक अधिकची किंमत घेऊन विकण्यास विकासकास परवानगी राहील.**

तथापि सदर प्रोत्साहनात्मक रक्कम ही २०% पेक्षा जास्त असणार नाही.

वरीलप्रमाणे सवलत अनुज्ञेय केल्यानंतरही योजना व्यवहार्य होत नसल्यास संबंधित विकासकाने योजना व्यवहार्य होत नसल्याच्या सविस्तर कारणमिमांसेसह बाजार मूल्य दर (ASR) किंमतीच्या २०% पेक्षा जास्त प्रोत्साहनात्मक किंमत देण्याची विनंती केल्यास त्याबाबत म्हाडा तसेच राज्यस्तरीय मूल्यमापन समिती (SLAC) च्या शिफारशी विचारात घेऊन मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय मंजुरी व संनियंत्रण समिती (SLSMC) अशा प्रकारे २०% पेक्षा जास्त प्रोत्साहनात्मक किंमत देण्याबाबत उचित निर्णय घेईल.

सदरहू तरतुदी पूर्वलक्षी प्रभावाने म्हणजेच दि.११.०६.२०१८ पासून लागू राहतील.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१८११२६१६१४००९५०९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manohar Ramchandra Parkar

Digitally signed by Manohar Ramchandra Parkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c4c0810e9c94cf92d42a36d93c8f7b6ac18542c1ee758c9cfddcea906d9cf544, serialNumber=fb43688343316856c0f7e793462127aa87fce45724e87929c6889798cd7d2c62, cn=Manohar Ramchandra Parkar
Date: 2018.11.26 16:18:21 +05'30'

**( म.रा.पारकर )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, (पत्राने)

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

३) मा.मंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

४) मा.राज्यमंत्री (गृहनिर्माण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

५) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, म. वि. स., विधानभवन, मुंबई.

६) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, म. वि. स., मुंबई

७) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.

८) उपाध्यक्ष व मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन,वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.

९) व्यवस्थापकीय संचालक,शिवशाही पुनर्वसन प्रकल्प मर्यादित, वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.

१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे(पूर्व), मुंबई-५१.

११) मुख्य कार्यकारी अधिकारी, धारावी पुनर्वसन प्रकल्प, गृहनिर्माण भवन, वांद्रे(पूर्व),मुंबई-५१.

१२) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.

१३) निवडनस्ती/गृनिधो-२ कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.